**श्री.नितीन तानाजी बारहाते, उप विभागीय अभियंता यांना मानीव दिनांक मंजुर करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन आदेश क्रमांकः मानीव-२०२४/प्र.क्र.२१/आस्था-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई
दिनांक : २७ फेब्रुवारी, २०२५

**वाचा :-** १) शासन परिपत्रक, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्रमांक ज्येष्ठता-२०१३/प्र.क्र.३४७/सेवा-३, दिनांक ०६.०९.२०१४
२) शासन शुद्धीपत्रक, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्रमांक ज्येष्ठता-२०२३/प्र.क्र.८२/सेवा-३, दिनांक ३०.०४.२०२४

**प्रस्तावना -**

सहायक अभियंता, श्रेणी-२ यांना उप विभागीय अभियंता पदावर पदोन्नतीसाठी {दिनांक १.०९.२०१६ च्या निवडसूचीसाठी (सन २०१६-१७)} सार्वजनिक बांधकाम विभागाकडून दिनांक ०६.०९.२०१४ रोजी प्रसिद्ध करण्यात आलेल्या अंतिम ज्येष्ठता सूचीचा आधार घेण्यात आला होता.

दिनांक ०६.०९.२०१४ रोजी प्रसिद्ध करण्यात आलेल्या ज्येष्ठता सूचीमध्ये श्री. नितीन तानाजी बारहाते यांना ज्येष्ठता क्रमांक १०९४ देण्यात आला होता. सबब, श्री. बारहाते यांचा सदर निवडसूचीत पदोन्नतीसाठी विचार करण्यात आला नाही.

श्री.बारहाते यांनी सहायक अभियंता, श्रेणी-२ संवर्गाच्या दि.०६.०९.२०१४ रोजीच्या अंतिम ज्येष्ठता सूचीमध्ये सुधारणा करण्याच्या अनुषंगाने मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधीकरण, नागपूर खंडपीठामध्ये मूळ अर्ज क्र.१०१२/२०१४ दाखल केला होता. प्रस्तुत प्रकरणी मा.न्यायाधीकरणाने दिनांक ३१.०१.२०२३ रोजी दिलेल्या अंतिम आदेशाच्या अनुषंगाने विभागाने दिनांक ०६.०९.२०१४ रोजी प्रसिद्ध केलेल्या सहायक अभियंता, श्रेणी-२ संवर्गाच्या अंतिम ज्येष्ठता यादीमध्ये दिनांक ३०.०४.२०२४ रोजीच्या शुद्धीपत्रकान्वये बदल करून, सदर अंतिम ज्येष्ठतासूचीमध्ये श्री.बारहाते यांना ६५५-इ (१) हा ज्येष्ठता क्रमांक देण्यात आला आहे.

उपरोक्त बदलामुळे श्री. बारहाते हे श्री. महादेव डोंगरवार (ज्येष्ठता क्रमांक ६५५-फ) यांना सेवाजेष्ठ ठरत असल्याने श्री.डोंगरवार यांच्या पदोन्नतीचा दिनांक ३१.०७.२०१७ हा मानीव दिनांक देण्याबाबत श्री.बारहाते यांनी दिनांक ०२.०५.२०२४ च्या अर्जान्वये मागणी केली होती. सबब, श्री. बारहाते यांना मानीव दिनांक देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन आदेश :-**

श्री. नितीन तानाजी बारहाते उप विभागीय अभियंता हे सहायक अभियंता, श्रेणी-२ पदाच्या ज्येष्ठतेनुसार श्री. महादेव डोंगरवार यांना सेवाज्येष्ठ ठरत असल्याने श्री. डोंगरवार यांचा उपविभागीय अभियंता (स्थापत्य) पदावरील पदोन्नतीचा दिनांक ३१.०७.२०१७ हा दिनांक श्री. बारहाते यांना उप विभागीय अभियंता पदाच्या पदोन्नतीचा मानीव दिनांक म्हणून खालीलप्रमाणे मंजुर करण्यात येत आहे.

| **अ.क्र.** | **अभियंत्यांची नावे** | **पदोन्नतीचे पद** | **निकटतम अधिका-याचे नाव/पदोन्नती चा दिनांक** | **प्रत्यक्ष नियुक्तीचा दिनांक** | **पदोन्नतीच्या पदाचा मंजूर करण्यात येत असलेला मानीव दिनांक** |
|---|---|---|---|---|---|
| १ | श्री. नितीन तानाजी बारहाते | उपविभागीय अभियंता | श्री.महादेव डोंगरवार, दि.३१.०७.२०१७ | दि.०७.१०.२०२१ | दि.३१.०७.२०१७ |

**२.** सदर मानीव दिनांक खालील अटींच्या अधीन राहून मंजुर करण्यात येत आहे :-

१) श्री.नितीन बारहाते यांना उपविभागीय अभियंता या पदोन्नतीच्या पदावर मंजूर करण्यात आलेला दि.३१.०७.२०१७ हा पदोन्नतीचा मानीव दिनांक, ते सहायक अभियंता, श्रेणी-२ या संवर्गातील पदावरून उपविभागीय अभियंता या पदावर देण्यात आलेल्या पदोन्नतीच्या अनुषंगाने ते सदर पदावर प्रत्यक्ष रूजू झाल्याच्या दिनांकापर्यंत त्यांची काल्पनिक वेतननिश्चिती करण्यात यावी.

२) तसेच दि.३१.०७.२०१७ हा पदोन्नतीचा मानीव दिनांक, ते श्री.बारहाते यांना उपविभागीय अभियंता या पदावर देण्यात आलेल्या पदोन्नतीच्या अनुषंगाने, श्री.बारहाते सदर पदावर रूजू झाल्याच्या प्रत्यक्ष दिनांकापर्यंत या कालावधीतीलकाल्पनिक वेतननिश्चितीच्या अनुषंगाने वेतन व भत्त्यांची थकबाकी, श्री.बारहाते यांना अनुज्ञेय राहणार नाही.

**३. श्री.नितीन तानाजी बारहाते यांनी दिनांक ०६.०९.२०१४ रोजी प्रसिद्ध केलेल्या सहा.अभियंता श्रेणी-२ संवर्गाच्या ज्येष्ठता यादीत सुधारणा करण्याच्या अनुषंगाने मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधीकरण, नागपूर खंडपीठ येथे मूळ अर्ज क्र.१०१२/२०१४ दाखल केला होता. सदर अर्ज दिनांक ३१.०१.२०२३ रोजी निकाली काढताना मा.न्यायाधीकरणाने श्री.बारहाते यांच्या सेवाज्येष्ठतेत बदल करण्याचे आदेशित केले होते. तद्नुषंगाने श्री.बारहाते यांच्या सेवाज्येष्ठतेत बदल करण्यात आला आहे. तथापि, मा.न्यायाधीकरणाच्या सदर निकालाविरोधात श्री.प्रविण वानखेडे व इतर यांनी मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधीकरण, नागपूर खंडपीठ येथे पूनर्विलोकन अर्ज क्र.६७१/२०२३ दाखल केला आहे. सदर पूनर्विलोकन अर्जावरील निर्णय अद्यापि प्रलंबित असुन सदर अर्जावरील मा.न्यायाधीकरणाच्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहून मानीव दिनांकाचे आदेश निर्गमित करण्यात येत आहे.**

**४.** हे आदेश, संबंधीत वर्षाच्या निवडसूचीस महाराष्ट्र लोकसेवा आयोगाची मान्यता प्राप्त होण्याच्या अधीन तसेच सामान्य प्रशासन विभागाच्या दि.२५.१२.२०२४ च्या तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक २८/२५/सेवा-३, दिनांक २३.०१.२०२५ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०२२७१५४७०७१३१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by SANJAY SHAMKANT DEGAONKAR
Date: 2025.02.27 15:51:43 +05'30'

**( संजय शा. देगांवकर )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर
२. महालेखापाल (लेखा परिक्षा/ लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
३. जिल्हा कोषागार अधिकारी, कोषागार कार्यालय, नागपूर
४. श्री. नितीन तानाजी बारहाते, उप विभागीय अभियंता (मुख्य अभियंता,नागपूर यांच्या मार्फत)
५. कार्यासन अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन-१२), मंत्रालय, मुंबई
६. कार्यासन अधिकारी, वित्त विभाग (कार्यासन- सेवा-३), मंत्रालय, मुंबई
७. निवडनस्ती (आस्था-३)